बिगर राज्य नागरी सेवेतून (Non-SCS) भारतीय प्रशासन सेवेत निवडीने नियुक्तीच्या शिफारशीसाठी पात्रता निकष (Benchmark Criteria) विहित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन शुध्दीपत्रक क्रमांकः एआयएस-१३१७/प्र.क्र. ४५ /२०१७/दहा
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १९.०४.२०१७

**संदर्भ:-**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एआयएस १३१७/प्र.क्र.४५/२०१७/दहा, दि.०४.०२.२०१७
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र.एआयएस १३१७/प्र.क्र.४५/२०१७/दहा, दि.२३.०२.२०१७

**प्रस्तावना-**

बिगर राज्य नागरी सेवेतून भारतीय प्रशासन सेवेत निवडीने नियुक्तीच्या (NON SCS) शिफारशींसाठी संदर्भाधीन दिनांक ०४.०२.२०१७ च्या शासन निर्णयान्वये आणि तद्नुषंगिक दिनांक २३.०२.२०१७ च्या शुध्दीपत्रकान्वये सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडून दिनांक ३१.०३.२०१७ पर्यंत प्रस्ताव मागविण्यात आले होते. प्राप्त झालेल्या प्रस्तावांच्या अनुषंगाने काही विसंगती/त्रुटी निदर्शनास आल्या आहेत. सदर विसंगती/त्रुटी दूर करण्याच्या दृष्टीने खालीलप्रमाणे सुधारणा करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

**शासन शुध्दीपत्रक -**

(अ) संदर्भाधीन दिनांक ०४.०२.२०१७ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. २ मध्ये संदर्भाधीन दिनांक २३.०२.२०१७ च्या शुध्दीपत्रकान्वये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात आली आहे,-

"प्रत्येक मंत्रालयीन प्रशासकीय विभागाने उपरोक्त अ.क्र. अ), ब), क) व ड) येथील पात्रता धारण करणाऱ्या **कमाल १० अधिकाऱ्यांच्याच** नावांचा प्रस्ताव या विभागास पाठवावा. असा प्रस्ताव पाठविताना ज्या अधिकाऱ्यांच्या १० गोपनीय अभिलेखांपैकी किमान ९ गोपनीय अभिलेख अत्युत्कृष्ट दर्जाचे आहेत असा **सेवाज्येष्ठ अधिकारी** वगळला जाणार नाही याची संबंधित प्रशासकीय विभागाने दक्षता घ्यावी. तसेच गोपनीय अहवालांची गणना करताना खालील कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी ".

**याऐवजी**

"प्रत्येक मंत्रालयीन प्रशासकीय विभागाने सदर विभागाअंतर्गतच्या **प्रत्येक सेवेतून** (सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र. एआयएस-१३०४/प्र.क्र. ४९१/२००४/१०, दिनांक २४.१२.२००४ अन्वये विहित केलेल्या) उपरोक्त अ.क्र. अ), ब), क) व ड) येथील पात्रता धारण करणाऱ्या प्रत्येकी **कमाल १० अधिकाऱ्यांच्या** नावांचा प्रस्ताव या विभागास पाठवावा. असा प्रस्ताव पाठविताना ज्या अधिकाऱ्यांच्या १० गोपनीय अभिलेखांपैकी किमान ९ गोपनीय अभिलेख अत्युत्कृष्ट दर्जाचे आहेत असा **सेवाज्येष्ठ अधिकारी** वगळला जाणार नाही याची संबंधित प्रशासकीय विभागाने दक्षता घ्यावी. तसेच गोपनीय अहवालांची गणना करताना खालील कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी". असे वाचण्यात यावे.

**(ब)** संदर्भाधीन दिनांक ०४.०२.२०१७ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. २ (३) मध्ये -

"तसेच अत्युत्कृष्ट गोपनीय अहवालांची गणना करताना एखाद्या गोपनीय अहवाल वर्षात ६ महिने अथवा त्यापेक्षा जास्त कालावधीचा गोपनीय अहवाल उपलब्ध असेल तरच सदर गोपनीय अहवालाची जी प्रतवारी असेल

ती संपूर्ण वर्षाची प्रतवारी समजण्यात यावी. जर ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीची NRC (रजा/वैध कारणास्तवची ना अहवाल प्रमाणपत्रे) असेल तर त्या संपूर्ण वर्षाची प्रतवारी NRC समजण्यात यावी”.

## याऐवजी

“अत्युत्कृष्ट गोपनीय अहवालांची गणना करताना एखाद्या गोपनीय अहवाल वर्षात ६ महिने अथवा त्यापेक्षा जास्त कालावधीचा गोपनीय अहवाल उपलब्ध असेल तर सदर गोपनीय अहवालाची जी प्रतवारी असेल ती संपूर्ण वर्षाची प्रतवारी समजण्यात यावी. तसेच जर एखाद्या गोपनीय अहवाल वर्षात प्रतिवेदन/पुनर्विलोकन अधिका-यांचा कालावधी ३ महिन्यांपेक्षा कमी असल्याच्या कारणास्तव/सक्तीचा प्रतिक्षा कालावधी असल्याच्या कारणास्तव (केवळ प्रशासकीय कारणास्तव) ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीची NRC असेल तर त्याच वर्षीच्या उपलब्ध असलेल्या जास्त कालावधीच्या उर्वरित गोपनीय अहवालाची प्रतवारी ही त्या संपूर्ण वर्षाची प्रतवारी समजण्यात यावी. तसेच प्रशासकीय कारणाव्यतिरिक्त अन्य कारणास्तव (रजा/वैध कारणास्तवची ना अहवाल प्रमाणपत्रे) ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीची NRC असेल तर त्या संपूर्ण वर्षाची प्रतवारी NRC समजण्यात यावी”

२. प्रत्येक मंत्रालयीन प्रशासकीय विभागांकडून उपरोक्त सुधारणांच्या आधारे सुधारित प्रस्ताव मागविण्यात यावेत. या निवडप्रकियेकरिता संघ लोकसेवा आयोगाने वेळापत्रक विहित केले असल्याने, त्यानुसार प्रक्रिया वेळेत पार पाडण्याच्या दृष्टीने, **दिनांक १५.०५.२०१७ पर्यंत साप्रवि/कार्यासन-१० मध्ये प्राप्त होणारे सुधारित प्रस्तावच विचारात घेण्यात येतील**.

३. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक क्रमांक २०१७०४१८१७३२०३४८०७ असा आहे. हे शासन शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mukesh Khullar

Digitally signed by Mukesh Khullar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6481e097db98eaae8b05801305 44ebced12d1340cea24fcd0132235fb0c54 4a8, cn=Mukesh Khullar
Date: 2017.04.19 11:13:22 +05'30'

**( मुकेश खुल्लर )**
**अपर मुख्य सचिव (सेवा)**

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
६. महालेखापाल, मुंबई/नागपूर,
७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
८. सचिव, कार्मिक व प्रशिक्षण विभाग, भारत सरकार, नवी दिल्ली,
९. सचिव, संघ लोकसेवा आयोग, नवी दिल्ली,
१०. सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव,
११. सर्व मंत्रालयीन विभाग,
१२. निवड नस्ती.